# गाजर बोलत नाही

कैथरीन

मराठी : अश्विनी बर्वे





एके काळी, खूप पूर्वी, एक मुलगा
आणि एक मुलगी खेळत होते.



"मला भूक लागली आहे," मुलगा म्हणाला.

“माझ्याजवळ खाण्यासाठी काही नाही.”

“माझ्याजवळ एक सफरचंद आहे,” मुलगी म्हणाली.



“पण मला सफरचंद नको,” मुलगा म्हणाला.

मला वाटतं की गाजर आणण्यासाठी बागेत जावं.”

“ मी इथंच थांबते!” मुलगी म्हणाली.



मग मुलगा बागेत गेला, तो एक गाजर ओढू लागला. जेव्हा तो ओढे तेव्हा,

तो उसे किसी की आवाज़ सुनाई देती.





“मला खाऊ नको!” गाजर म्हणाले, “जर तू मला खाल्ले तर मला खूप दुःख होईल.”



हे ऐकून मुलाने उडीच मारली. तो म्हणाला, “हे गाजर होऊच शकत नाही, मला माहित आहे गाजर बोलू शकत नाही.”





“तुला हे नक्की माहित आहे?” कुत्राने विचारले, ते तिथंच आराम करत होतं.



“काय?“ मुलगा म्हणाला. “आता माझ्याशी कोण बोलतं आहे? इथं अजून कोण आहे?”





“हो,“ कुत्रा म्हणाला. “इथं खुपजण आहेत, गाजर आहे, आणि मी पण आहे.”



मुलाने कधी बोलणाऱ्या गाजराविषयी किंवा बोलणाऱ्या कुत्र्याविषयी ऐकलं नव्हतं. तो खूप घाबरला. तो लपण्यासाठी झाडाच्या मागे गेला.



“इथं नको लपू,” झाड म्हणालं.



मुलाने परत उडी मारली, त्याने विचारलं, “कोण माझ्याशी बोलत आहे? झाड नाही बोलणार कारण मला खात्री आहे की झाडं कधी बोलत नाही.”



"इतकी खात्री नको बाळगू," झाड म्हणाले.
"काय?" मुलगा म्हणाला, "इथं कोण आहे?"

"हो," झाड म्हणालं. "गाजर आहे, कुत्रा आहे आणि मी पण आहे."



मुलाने बोलणारे गाजर, बोलणारा कुत्रा, किंवा बोलणाऱ्या झाडाविषयी ऐकलं नव्हतं. तो खूप घाबरला म्हणून तो मुलीला शोधायला पळाला.

"तुला खाण्यासाठी काही मिळालं का?" मुलीने विचारलं.

"नाही," मुलगा म्हणाला. "जेव्हा-जेव्हा मी गाजर ओढण्याचा प्रयत्न केला तेव्हा गाजर माझ्याशी बोललं. मग एक कुत्रा माझ्याशी बोलला आणि मग एक झाड माझ्याशी बोललं."



मुलीला मुलगा एकदम उदास वाटला. “तू खूप वेळ उन्हात फिरला ना, आता तू घरी जाऊन आराम कर.” “हो, मला आरामाची खरंच गरज आहे,” मुलगा म्हणाला.





जेव्हा मुलगा निघून गेला, तेव्हा मुलगी सफरचंद खायला बसली.




समाप्त